कार्यकारी अभियंता, सा.बां. (आदिवासी) विभाग, चंद्रपूर कार्यालयांतर्गत उपविभीगय अभियंता, सां.बां. (आदिवासी) उपविभाग, आलापल्ली, जि.गडचिरोली येथे सेवानिवृत्त उप अभियंता यांची कंत्राटी तत्वावर नेमणूक करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आविवि-२०२३/प्र.क्र.५५/का.१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १० एप्रिल, २०२३

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दिनांक १७.१२.२०१६

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१८/प्र.क्र.११३/आ.पु.क., दिनांक ११.१२.२०१८

३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक शाआशा-२०१५/ प्र.क्र.९८/का-१३, दि.१४.०७.२०१६

४) आदिवासी विकास विभाग, क्रमांक आस्था-२०२०/प्र.क्र.४१/का-१, दि.३१.०७.२०२० रोजीचे पत्र.

५) आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांचे क्रमांक प्रशा-२०२३/ प्र.क्र.१४४/ का-२(२)/ २४६०, दि.३१.०३.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहे यांचे बांधकाम व देखभाल-दुरुस्तीसाठी आदिवासी विकास विभागांतर्गत स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्ष या विभागाच्या दि. १४.०७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेला आहे. आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत असलेल्या बांधकाम व्यवस्थापन कक्षांतर्गत विभाग व उपविभागामध्ये उप अभियंता यांची पदे मोठ्या प्रमाणात रिक्त असल्यामुळे विभाग व उप विभाग यांच्या कामकाजावर विपरित परिणाम होत असल्याचे दिसून येत आहे. तसेच सदरची पदे भरण्याचे अधिकार सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारित असल्याने व सार्वजनिक बांधकाम विभागाकडेही पुरेस मनुष्यबळ नसल्याने सदरचे पदे ही बऱ्याच कालावधीकरिता रिक्त आहेत. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या अध्यक्षते खालील गठीत समितीने उपअभियंता या पदाकरीता सेवानिवृत्त अधिकारी यांची निवड करण्याकरीता शिफारस केली आहे. त्यानुसार बांधकाम व्यवस्थापन कक्षांअतर्गत कामाच्या अंमलबजावणीकरीता सेवानिवृत्त उपअभियंता यांची कंत्राटी स्वरुपात एका वर्षाच्या कालावधीसाठी कंत्राटी पध्दतीने नेमणूक देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

श्री.जी.बी.उईके, सेवानिवृत्त उपअभियंता यांना सा.बां. (आदिवासी) विभाग चंद्रपूर अंतर्गत सार्वजनिक बांधकाम (आदिवासी), उपविभाग, आलापल्ली, जि.गडचिरोली येथे दिनांक १०.०४.२०२३ पासून प्रथम एक वर्षाच्या कालावधीकरीता करार पध्दतीने उपविभागीय अभियंता/उपअभियंता या पदाकरीता नियुक्ती देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सेवानिवृत्त उप अभियंता यांची कंत्राटी पदावरील नियुक्तीच्या कालावधीत कर्तव्ये व जबाबदाऱ्या तसेच अटी व शर्ती शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६ मध्ये नमूद केल्याप्रमाणे लागू राहतील.

३. सेवानिवृत्त उप अभियंता यांचे मासिक परिश्रमिक व भत्ते सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.२७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६ मधील तरतूदी प्रमाणे देय राहील.

४. या प्रकरणी येणारा खर्च आदिवासी विकास आयुक्तालय लेखाशिर्ष (२२२५ १३९३) या कार्यक्रम खर्चाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. तसेच आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत निधीची तरतुद कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी विभाग) चंद्रपूर यांना उपलब्ध करुन देण्यात यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१८/प्र.क्र.११३/आ.पु.क. दि.११.१२.२०१८ तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६ मधील अटी व शर्तीच्या अधीन राहून काढण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१०१५४९५६१७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHAILA RAVINDRA MITHBAVKAR

Digitally signed by SHAILA RAVINDRA MITHBAVKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=8bb03c6d206c79568018ba9511400e3bd24537b79e0985b2d7a66c816ab002f9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B690FCB0310A2F5A64767BD701F665FB310AED38BCC5147A578F88193C1DDA0, cn=SHAILA RAVINDRA MITHBAVKAR
Date: 2023.04.10 16:21:59 +05'30'

**(शैला मिठबावकर)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

४) महालेखापाल-१,(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई

५) महालेखापाल-१,(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर

६) अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई

७) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

८) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक

९) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर

१०)मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

११)मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर

१२)अधीक्षक अभियंता, सा.बां.(आदिवासी) मंडळ,नाशिक/नागपूर

१३)अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१४)निवासी लेखा अधिकारी, मुंबई

१५) सर्व उप सचिव/ अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१६)कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, धुळे/ठाणे/अमरावती/चंद्रपूर

१७)अवर सचिव (का.क्र.०६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१८)कक्ष अधिकारी (का-१, १४) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१९)कक्ष अधिकारी (सेवा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

२०)लेखाधिकारी (रोखशाखा) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२१)श्री.जी.बी.उईके, सेवानिवृत्त उप विभागीय अभियंता, द्वारा, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ, नागपूर.

२२)निवड नस्ती